**अग्निशमन दलातील कर्मचा-यांना आपत्कालिन मदत / अर्थसहाय्य करणेबाबत.**

**महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधी स्थापन करणे.**

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक :- अशस-२००९/प्र.क्र.२३०/नवि-२०
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १२ मार्च, २०१०

**प्रस्तावना:-**

राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका, राज्य शासकीय उपक्रम उदा. सिडको / एमआयडीसी, विशेष नियोजन प्राधिकरणे तसेच शासकीय / निमशासकीय संस्था यांच्या मार्फत कार्यान्वित अग्निशमन सेवेत कार्यरत अग्निशमन अधिकारी / कर्मचारी यांना आपले कर्तव्य बजावतांना मृत्यु अथवा गंभीर शारीरिक ईजा / विकलांगता (कायम स्वरुपी आणि अंशत:) आल्यास सानुग्रह अनुदान म्हणून मदत देण्यासाठी **महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधी** स्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता. याबाबत सर्वंकष विचार करुन शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील महानगरपालिका / नगरपालिका, राज्य शासकीय उपक्रम उदा. सिडको / एमआयडीसी, विशेष नियोजन प्राधिकरणे तसेच शासकीय / निमशासकीय संस्था यांच्या मार्फत कार्यान्वित अग्निशमन सेवेत कार्यरत अग्निशमन अधिकारी / कर्मचारी यांना आपले कर्तव्य बजावताना मृत्यु अथवा गंभीर शारीरिक ईजा / विकलांगता (कायम स्वरुपी आणि अंशत:) आल्यास सानुग्रह अनुदान म्हणून मदत देण्यासाठी "महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधी" स्थापन करण्यास मान्यता देण्यांत येत आहे.

०२. सदर निधीची विश्वस्त नोंदणी अधिनियमांतर्गत संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांनी धर्मादाय आयुक्त यांचेकडे नोंदणी करावी.

०३. सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्था तसेच विशेष नियोजन प्राधिकरणे यांनी महाराष्ट्र आग प्रतिबंधक व जीवसंरक्षक उपाययोजना अधिनियम, २००६ च्या कलम २५ अन्वये स्थापन केलेल्या अग्निसुरक्षा निधीमध्ये जमा होणा-या एकूण रकमेच्या ५% तरतूद प्रतिवर्षी राज्यस्तरावर स्थापन होणा-या "महाराष्ट्र अग्निसुरक्षा सेवा कल्याण निधी" मध्ये जमा करावी.

सदर निधीत देणगीदारांकडून देणग्या स्विकारण्याची ही मुभा असेल.

०४. महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधी यांचे खाते राष्ट्रीयकृत बँकेमध्ये उघडावे व त्याचे संचलन, संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांचेमार्फत करण्यांत यावे.

०५. या निधीची लेखा तपासणी महालेखापाल किंवा सनदी लेखापाल यांच्याकडून करण्यात यावी.

०६. महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधीतून सानुग्रह अनुदान मंजूर करण्यासंबंधी निकष परिशिष्ट-अ मध्ये नमुद केल्याप्रमाणे राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( के. व्ही. कुरुंदकर )
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

सहपत्र : परिशिष्ट - "अ"

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
११. संचलाक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई
१२. आयुक्त, सर्व महानगरपालिका
१३. संचालक तथा अग्निशमन सल्लागार, महाराष्ट्र अग्निशमन सेवा, द्वारा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, (अग्निशमन विभाग) उद्योग सारथी, २ रा मजला, महाकाली गुंफा मार्ग, अंधेरी (पूर्व), मुंबई-९३
१४. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१५. मुख्याधिकारी, सर्व नगरपालिका/नगर पंचायती
१६. नगर विकास विभागातील सर्व अधिकारी
१७. कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (वेबसाईटसाठी)
१८. निवडनस्ती (नवि-२०)

नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रमांकः- अशस-२००९/प्र.क.२३०/नवि-२०,
दिनांक : १२ मार्च, २०१० चे सहपत्र

## परिशिष्ट "अ"

## महाराष्ट्र अग्निशमन सेवा कल्याण निधीतून सानुग्रह अनुदान देण्यासंबंधी निकष

१. अग्निशमन अधिकारी अथवा कर्मचाऱ्यांचा कर्तव्य बजावताना मृत्यु झाल्यास त्याच्या कुटुंबियांना रु. १०.०० लाख. मात्र सानुग्रह अनुदान अनुज्ञेय राहील.

२. कर्तव्य बजावतांना अग्निशमन अधिकारी / कर्मचारी कोमा (Coma) मध्ये गेल्यास अथवा अतिशय गंभीररित्या जखमी झाल्यास किंवा त्याचा अवयव कायमस्वरुपी निकामी झाल्यास त्याच्या कुटुंबियांना रु. ५.०० लाख. मात्र सानुग्रह अनुदान अनुज्ञेय राहील.

३. विकलांगतेची टक्केवारी किती आहे, याबाबत शासनाने मान्य केलेले सक्षम वैधकीय अधिकाऱ्यांचे प्रमाणपत्र आवश्यक राहील. त,सेच ही विकलांगता सर्वसामान्य विकलांगतेचे मापदंड न लावता संबंधीत अधिकारी / कर्मचारी पुढे अग्निशमन सेवेत काम करण्यास सक्षम आहे किंवा कसे हे लक्षात घेऊन विकलांगता निश्चित करण्यांत यावी.

४. सानुग्रह अनुदान मंजूर करण्याचे अधिकार संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा यांना राहतील. त्याकरिता ते आपल्या स्तरावर समिती गठीत करु शकतील.
प्रत्येक प्रकरणी सानुग्रह अनुदान मंजूर केल्यानंतर संचालकांनी त्याविषयी शासनास अहवाल सादर करणे आवश्यक राहील.

------------------